सार्वजनिक बांधकाम विभागात अपर मुख्य सचिव दर्जाचे एक पद निर्माण करणे व त्या विभागातील प्रशासकीय रचनेची पुर्नरचना करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१४/प्र.क्र.८१२/२०१४/दहा**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक १५ जानेवारी, २०१५

**प्रस्तावना :-**

विविध राज्यात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रशासकीय विभागप्रमुख पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी कार्यरत आहेत. त्या धर्तीवर महाराष्ट्रातही सार्वजनिक बांधकाम विभागात प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी नेमण्याची व त्या अनुषंगाने त्या विभागच्या प्रशासकीय रचनेची पुर्नरचना करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

सार्वजनिक बांधकाम विभागील सध्याची सचिव (बांधकामे) व सचिव (रस्ते) ही पदे तशीच पुढे चालू ठेवण्याचा व त्या विभागात अपर मुख्य सचिव दर्जाचे (वेतनश्रेणी रूपये ८००००/- निश्चित) एक पद दिनांक ०१.०१.२०१५ पासून नव्याने निर्माण करण्याचा व या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अपर मुख्य सचिव श्रेणीतील किंवा आवश्यक तेव्हा पद अवनत करून प्रधान सचिव श्रेणीतील अधिकाऱ्याची नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. तसेच, सार्वजनिक बांधकाम विभागातील प्रशासकीय रचनेची पुर्नरचना करण्यात येत असून नव्याने निर्माण झालेले अपर मुख्य सचिव हे पद त्या विभागाचे प्रशासकीय प्रमुखांचे राहील व सचिव (बांधकामे) व सचिव (रस्ते) हे त्यांच्या पर्यवेक्षीय नियंत्रणाखाली काम करतील, असाही निर्णय शासनाने घेतला आहे.

४. सार्वजनिक बांधकाम विभागासाठी अपर मुख्य सचिव दर्जाच्या (वेतनश्रेणी रूपये ८००००/- निश्चित) निर्माण केलेल्या पदाबाबतचा खर्च त्या विभागास मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४१/१५/व्यय-४, दिनांक १५.०१.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१५०११५१५३४३५३६०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.01.15 17:53:14 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय )**
**अपर मुख्य सचिव (सेवा)**
सामान्य प्रशासन विभाग

**प्रत:**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र २ नागपूर
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. मा. राज्यपाल यांचे सचिव
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
६. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने)
८. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
९. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
१०.सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग
११.सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग
१२.सार्वजनिक बांधकाम विभाग (आस्थापना/रोख)
१३.वित्त विभाग (व्यय-४) मंत्रालय, मुंबई
१४.सर्व मंत्रालयीन विभाग
१५.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१६.सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१८ (र.व.का)
१७. सामान्य प्रशासन विभाग कार्यासन-९/९-अ/१०-अ
१८. निवड नस्ती (कार्यासन-दहा)

*****